कार्यकारी अभियंता (विद्युत) संवर्गातील अधिकाऱ्याची बदली / पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः बदली-११२४/प्र.क्र.०२(२)/सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०७ जून, २०२४.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील कार्यकारी अभियंता (विद्युत) संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्याची बदली त्यांच्या विनंतीनुसार, सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | बदली नंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्रीमती ऋतुजा केतन गाडगीळ. | पदस्थापनेच्या प्रतिक्षेत. (उपसंचालक (तांत्रिक) ,महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई या पदावरुन कार्यमुक्त) | कार्यकारी अभियंता (विद्युत), यवतमाळ (विद्युत) सा.बां. विभाग, यवतमाळ. (रिक्त पदी) |

२. श्रीमती गाडगीळ यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. संबंधित अधिकाऱ्यांनी म. ना. से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहिल. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

३. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे कार्यभार सोडल्याचा तसेच कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा.

४. श्रीमती गाडगीळ यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात आली असल्याने त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहील.

५. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन पदस्थापनेच्या पदाचा कार्यभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६०७१३१३२७२८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.06.07 13:26:21 +05'30'

**(द.व.खारके)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई /कोकण / पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर / नांदेड / अमरावती / नागपूर / राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
६. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. संचालक (उपवने व उद्याने), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
११. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ..................
१२. श्रीमती ऋतुजा केतन गाडगीळ, कार्यकारी अभियंता (विद्युत) यांना संबंधित मुख्य अभियंता कार्यालयामार्फत,
१३. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१६. सचिव ( रस्ते / बांधकामे ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सर्व सहसचिव / उपसचिव / अवर सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. कार्यासन अधिकारी ( सेवा-६ / संगणक कक्ष ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. निवडनस्ती.